असा. क्र. ५ रजिस्टर्ड नं. टीईसीएच/४७-३०३/एमबीआय/२००३-०५

# महाराष्ट्र शासन राजपत्र

## असाधारण

**प्राधिकृत प्रकाशन**

**मंगळवार, जानेवारी १०, २००६/पौष २०, शके १९२७**

**स्वतंत्र संकलन म्हणून फाईल करण्यासाठी या भागाला वेगळे पृष्ठ क्रमांक दिले आहेत.**

## भाग चार-अ

**महाराष्ट्र शासनाने केंद्रीय अधिनियमांन्वये तयार केलेले (भाग एक, एक-अ आणि एक-ल यांमध्ये प्रसिद्ध केलेले नियम व आदेश यांव्यतिरिक्त) नियम व आदेश.**

**आदिवासी विकास विभाग**

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२, दिनांक १० जानेवारी २००६

### अधिसूचना

**भारताचे संविधान.**

क्रमांक टीडीआर. १०९६/प्र.क्र.२७ (अ)/का.१५.— भारतीय संविधानाच्या अनुच्छेद ३०९ खालील परंतुकान्वये प्रदान केलेल्या अधिकाराचा वापर करून आणि अस्तित्वात असलेले संबंधित सर्व विद्यमान नियम, आदेश किंवा अनुदेश अधिक्रमित करून महाराष्ट्राचे राज्यपाल, याद्वारे महाराष्ट्र शासनाच्या आदिवासी विकास विभागाच्या अखत्यारिखाली असलेल्या विविध कार्यालयातील संशोधन सहायक, कार्यालय अधीक्षक, कनिष्ठ प्रशासकीय अधिकारी,गट-ब, उपलेखापाल/आदिवासी विकास निरीक्षक आणि वरिष्ठ लिपिक/सांख्यिकी सहायक, गट-क पदाच्या सेवाभरतीचे विनियमन करणारे पुढील नियम करीत आहे. जसे—



[**किंमत :** रुपये ७.००]

१. या नियमांना आदिवासी विकास सेवेतील संशोधन सहायक, कार्यालय अधीक्षक/कनिष्ठ प्रशासकीय अधिकारी,गट-ब, उप लेखापाल/आदिवासी विकास निरीक्षक, वरिष्ठ लिपिक/ सांख्यिकी सहायक, गट-क पदांचे (सेवा प्रवेश) नियम, २००६ असे संबोधण्यात यावे.

२. या नियमात संदर्भानुसार दुसरा अर्थ अभिप्रेत नसेल तर,—

(अ) " आयुक्त " म्हणजे आदिवासी विकास आयुक्त, महाराष्ट्र राज्य, नाशिक ;

(ब) " आयुक्तालय " म्हणजे आदिवासी विकास आयुक्तालय ;

(क) " पदवी " म्हणजे मान्यताप्राप्त सांविधिक विद्यापीठाची पदवी ;

(ड) " पदविका " म्हणजे मान्यताप्राप्त सांविधिक विद्यापीठाची/मान्यताप्राप्त संस्थेची पदविका ;

(ई) " विभाग " म्हणजे महाराष्ट्र शासनाचा आदिवासी विकास विभाग ;

(फ) " शासन " म्हणजे महाराष्ट्र शासन ;

(ग) " संचालनालय " म्हणजे संचालक, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे यांचे कार्यालय.

३. संशोधन सहायक, गट-ब पदावरील नियुक्ती पुढीलपैकी कोणत्याही मार्गाने करता येईल :—

(अ) आदिवासी विकास सेवेतील उप लेखापाल/आदिवासी विकास निरीक्षक हे पद धारण करीत असलेल्या व त्या संवर्गात ३ वर्षांपेक्षा कमी नाही इतकी नियमित सेवा झालेल्या आणि पोट-नियम (ब) (२) अन्वये नामनिर्देशनाने नियुक्तीसाठी विहित केलेली शैक्षणिक अर्हता धारण केलेल्या व्यक्तींमधून ज्येष्ठता अधीन पात्रता या निकषावर पात्र ठरविलेल्या योग्य व्यक्तींच्या पदोन्नतीने, किंवा,

(ब) पुढील अटी पूर्ण करणाऱ्या उमेदवारांमधून नामनिर्देशनाने,—

(१) ज्यांचे वय ३३ वर्षांपेक्षा जास्त नाही,

(२) जे पदवी धारण करीत आहेत,

परंतु गणित, अर्थशास्त्र, वाणिज्य आणि सांख्यिकीशास्त्र यांपैकी कोणत्याही विषयातील पदवी धारण केलेल्या उमेदवारांना प्राधान्य राहील.

४. कार्यालय अधीक्षक/कनिष्ठ प्रशासकीय अधिकारी, गट-ब पदावरील नियुक्ती उप लेखापाल/आदिवासी विकास निरीक्षक हे पद धारण करणाऱ्या आणि त्या संवर्गात ३ वर्षांपेक्षा कमी नाही इतकी नियमित सेवा झालेल्या व्यक्तींमधून ज्येष्ठता अधीन पात्रता या निकषावर पात्र ठरविलेल्या योग्य व्यक्तींच्या पदोन्नतीने करण्यात येईल.

५. उप लेखापाल/आदिवासी विकास निरीक्षक, गट-क या पदावरील नियुक्ती पुढीलपैकी कोणत्याही मार्गाने करता येतील :—

(अ) वरिष्ठ लिपिक/सांख्यिकी सहायक हे पद धारण करणाऱ्या आणि त्या संवर्गात ३ वर्षांपेक्षा कमी नाही इतकी नियमित सेवा झालेल्या व्यक्तींमधून ज्येष्ठता अधीन पात्रता या निकषावर पात्र ठरविलेल्या योग्य व्यक्तींच्या पदोन्नतीने, किंवा,

(ब) पुढील अटी पूर्ण करणाऱ्या उमेदवारांमधून नामनिर्देशनाने,—

(१) ज्यांचे वय ३३ वर्षांपेक्षा जास्त नाही, आणि

(२) जे पदवी धारण करीत आहेत,

परंतु , सांविधानिक विद्यापीठाची पदव्युत्तर पदवी अथवा शिक्षण शास्त्रातील पदवी धारण करणाऱ्या उमेदवारांना प्राधान्य राहील.

६. वरिष्ठ लिपिक/सांख्यिकी सहायक, गट-क पदावरील नियुक्ती पुढीलपैकी कोणत्याही मार्गाने करता येईल :—

(अ) लिपिक-टंकलेखक हे पद धारण करणाऱ्या आणि त्या संवर्गात ३ वर्षांपेक्षा कमी नाही इतकी नियमित सेवा पूर्ण झालेल्या व्यक्तींमधून ज्येष्ठता अधीन पात्रता या निकषावर पात्र ठरविलेल्या योग्य व्यक्तींच्या पदोन्नतीने, किंवा,

(ब) पुढील अटी पूर्ण करणाऱ्या उमेदवारांमधून नामनिर्देशनाने,—

(१) ज्यांचे वय ३३ वर्षांपेक्षा जास्त नाही, आणि

(२) जे पदवी धारण करीत आहेत,

परंतु, गणित, अर्थशास्त्र, वाणिज्य आणि सांख्यिकीशास्त्र यांपैकी एका विषयासह पदवी धारण करणाऱ्या उमेदवारांना नियुक्तीसाठी प्राधान्य राहील.

७. नियम ३, ५ व ६ मध्ये नामनिर्देशनाने नियुक्तीसाठी विहित वयोमर्यादा अगोदरच शासन सेवेत कार्यरत असलेल्या उमेदवारांच्या बाबतीत ५ वर्षांनी शिथिलक्षम राहील.

८. नियम ३, ५ व ६ येथे नमूद केलेल्या पदावरील पदोन्नती व नामनिर्देशनाने केल्या जाणाऱ्या नेमणुका ५०:५० या गुणोत्तर प्रमाणात करण्यात येतील.

९. नियम ३,४,५ आणि ६ येथे नमूद केलेल्या पदावर नियुक्त केलेल्या व्यक्ती जर ती अगोदरच उत्तीर्ण झाली नसेल किंवा तिला उत्तीर्ण होण्यापासून सूट मिळाली नसेल तर, त्या पदासाठी विहित केलेल्या विभागीय परीक्षा आणि हिंदी व मराठी भाषा परीक्षा त्या संबंधी केलेल्या नियमानुसार उत्तीर्ण करणे आवश्यक राहील.

१०. नियम ३,४,५ व ६ मध्ये नमूद केलेल्या पदावर पदोन्नती अथवा नामनिर्देशनाने नियुक्त होणाऱ्या व्यक्तीला महाराष्ट्र शासनाच्या माहिती तंत्रज्ञान संचालनालयाने वेळोवेळी विहित केलेले

संगणक हाताळणी / वापराबाबतचे प्रमाणपत्र धारण करणे आवश्यक राहील.

११. नियम ३, ४,५ आणि ६ येथे नमूद केलेल्या पदांवर नियुक्त केलेली व्यक्ती राज्यात कोणत्याही ठिकाणी बदली करण्यास पात्र राहील.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

**कृ. मा. पवार,**
शासनाचे सह सचिव.

## TRIBAL DEVELOPMENT DEPARTMENT

Mantralaya Annexe, Mumbai 400 032 dated 10 January 2006

*NOTIFICATION*

CONSTITUTION OF INDIA.

No. TDR.1096/CR-27(A)/D-XV.— In exercise of the powers conferred by proviso to the Article 309 of the Constitution of India and in supersession of all existing rules, orders or instruments made in this behalf the Governor of Maharashtra is hereby pleased to make the following rules regulating recruitment to the post of Research Assistant, Office Superintendent/Junior Administrative Officer, Group-B, Deputy Accountant/ Tribal Development Inspector and Senior Clerk/ Statistical Assistant, Group-C in the various offices of the Tribal Development under the Tribal Development Department of the Government of Maharashtra, namely:—

1. These rules may be called the Research Assistant, Office Superintendent/Junior Administrative Officer, Group-B, Deputy Accountant/ Tribal Development Inspector and Senior Clerk/ Statistical Assistant, Group-C in the Tribal Development Services (Recruitment) Rules, 2006.

2. In these rules, unless the context requires otherwise,—

(*a*) "Commissioner" means Tribal Development Commissioner, Maharashtra State, Nashik;

(*b*) "Commissionerate" means Commissionerate of Tribal Development;

(*c*) "Degree" means a Degree of a Statutory University;

(*d*) "Department" means the Tribal Development Department of the Government;

(*e*) "Diploma" means a Diploma of Statutory University or Recognised Institute;

(*f*) "Directorate" means the office of Director, Tribal Research and Training Institute, Pune

(*g*) "Government" means the Government of Maharashtra.

3. Appointment to the post of Research Assistant, Group-B shall be made either—

(*a*) by promotion of suitable person on the basis of seniority subject to fitness from amongst the persons holding the post of Deputy Accountant/ Tribal Development Inspector having not less than three years regular service in that post possessing qualification mentioned in sub-rule (*b*)(*ii*);

OR

(*b*) by nomination from amongst the candidates who-

(*i*) are not more than 33 years of age;

(*ii*) possess a degree :

Provided that preference may be given to those candidates who possess degree either in the subject of Mathematics, Economics, Commerce and Statistics.

4. Appointment to the post of Office Superintendent/Junior Administrative Officer, Group-B, shall be made by promotion of a suitable person on the basis of seniority subject to fitness from amongst the persons holding the post of Deputy Accountant/Tribal Development Inspector having not less than three years regular service in that post.

5. Appointment to the post of Deputy Accountant/ Tribal Development Inspector, Group-C shall be made either —

(*a*) by promotion of a suitable person on the basis of seniority subject to fitness from amongst the persons holding the post of Senior Clerk/Statistical Assistant having not less than three years regular service in that post, OR

(*b*) by nomination from amongst the candidates who —

(*i*) are not more than 33 years of age,

(*ii*) possess a degree :

Provided that preference may be given to those candidates who possess Post-Graduate Degree or Degree in Education.

6. Appointment to the post of Senior Clerk/Statistical Assistant, Group-C shall be made, either —

(*a*) by promotion of a suitable person on the basis of seniority subject to fitness from amongst the persons holding the post of Clerk-typist having not less than three years regular service in that post ;

(*b*) by nomination from amongst the candidates who—

(*i*) are not more than 33 years of age,

(*ii*) possess a degree :

Provided that preference may be given to those candidates who possess degree with Mathematics, Economics, Commerce and Statistics as one of the subjects.

7. The age limit prescribed for appointment by nomination to the posts mentioned in rules 3,5 and 6 shall be relaxed by 5 years in case of candidates already working in Government service.

8. Appointment to the posts mentioned in rules 3, 5 and 6 by promotion and nomination shall be made in the ratio of 50:50.

9. A person appointed to any of the posts mentioned in rules 3, 4, 5 and 6 either by promotion or by nomination shall be required to pass the prescribed departmental examination and examination in Hindi and Marathi according to the rules made in that behalf unless he has already passed or has been exempted from passing those examination.

10. A person appointed to the posts mentioned in the rules 3, 4, 5 and 6 should possess a Certificate in Computer Operation prescribed by the Directorate of Information Technology, Government of Maharashra from time to time.

11. A person appointed to any of the posts mentioned in the rules 3, 4, 5 and 6 shall be liable for transfer anywhere in the State.

By order and in the name of the Governor of Maharashtra,

K. M. PAWAR,
Joint Secretary to Government.

## आदिवासी विकास विभाग

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२, दिनांक १० जानेवारी २००६

### अधिसूचना

**भारताचे संविधान.**

क्रमांक टिडीआर १०९६ / प्र.क्र.२७ (ब) / का.-१५, भारतीय संविधानाच्या अनुच्छेद ३०९ खालील परंतुकान्वये प्रदान केलेल्या अधिकारांचा वापर करून महाराष्ट्राचे राज्यपाल, याद्वारे महाराष्ट्र शासनाच्या आदिवासी विकास विभागाच्या अधिपत्याखालील आयुक्तालयातील/ संचालनालयातील आरेखक, कॅमेरामन कम प्रोजेक्टर ऑपरेटर, कलाकार तथा शिल्पकार, पंपचालक, गट-क पदाच्या सेवाभरतीचे विनियम करणारे पुढील नियम करीत आहे. जसे--

१. या नियमांना आदिवासी विकास सेवेतील आरेखक, कॅमेरामन कम प्रोजेक्टर ऑपरेटर, कलाकार तथा शिल्पकार, पंपचालक, गट-क पदांचे (सेवाप्रवेश) नियम, २००६ असे संबोधण्यात यावे.

२. या नियमात संदर्भानुसार दुसरा अर्थ अभिप्रेत नसेल तर,--

(अ) " आयुक्तालय " म्हणजे आदिवासी विकास आयुक्तालय;

(ब) " औद्योगिक प्रशिक्षण संस्था प्रमाणपत्र " म्हणजे राज्य व्यवसाय प्रशिक्षण परिषद किंवा उच्च व तंत्रशिक्षण विभाग, महाराष्ट्र शासन यांची मान्यता प्राप्त झालेल्या संस्थेमार्फत देण्यात आलेले प्रमाणपत्र;

(क) " उच्च माध्यमिक शाळा प्रमाणपत्र " म्हणजे महाराष्ट्र माध्यमिक आणि उच्च माध्यमिक शिक्षण मंडळ अधिनियम, १९६५ (१९६५ चा अधिनियम क्र.४१) अन्वये आयोजित करण्यात आलेली उच्च माध्यमिक प्रमाणपत्र परीक्षा अथवा शासनाने समतूल्य म्हणून घोषित केलेली अन्य कोणतीही परीक्षा;

(ड) " पदवी " म्हणजे मान्यताप्राप्त सांविधिक विद्यापीठाची पदवी;

(इ) " पदविका " म्हणजे मान्यताप्राप्त सांविधिक विद्यापीठाची / मान्यताप्राप्त संस्थेची पदविका;

(ई) " माध्यमिक शालांत प्रमाणपत्र " म्हणजे महाराष्ट्र माध्यमिक आणि उच्च माध्यमिक शिक्षण मंडळ अधिनियम, १९६५ (१९६५ चा अधिनियम क्र.४१) अन्वये घेण्यात आलेली माध्यमिक शाळा प्रमाणपत्र परीक्षा अथवा शासनाने समतूल्य म्हणून घोषित केलेली अन्य कोणतीही परीक्षा;

(उ) " विभाग " म्हणजे महाराष्ट्र शासनाचा आदिवासी विकास विभाग;

(ऊ) "शासन" म्हणजे महाराष्ट्र शासन;

(ए) "संचालनालय" म्हणजे संचालक, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे यांचे कार्यालय.

३. संचालनालयातील आरेखक, गट-क पदावरील नियुक्ती, पुढील अटी पूर्ण करणाऱ्या उमेदवारांमधून नामनिर्देशनाने करण्यात येईल :—

(अ) ज्यांचे वय ३३ वर्षांपेक्षा जास्त नाही;

(ब) ज्यांनी माध्यमिक शाळा प्रमाणपत्र परीक्षा उत्तीर्ण केली आहे; आणि

(क) जे शासनाची/मान्यताप्राप्त संस्थेची इंटरमेडियेट ग्रेड ड्राइंग परीक्षा उत्तीर्ण आहेत.

परंतु, वरील (ब) व (क) येथील अर्हता प्राप्त केल्यानंतर दोन वर्षांपेक्षा कमी नसलेल्या कालावधीचा आरेखनामधील प्रत्यक्ष कामाचा अनुभव असलेल्या उमेदवारांना प्राधान्य राहील.

४. कॅमेरामन कम प्रोजेक्टर ऑपरेटर, गट-क पदावरील नियुक्ती, पुढील अटी पूर्ण करणाऱ्या उमेदवारांमधून नामनिर्देशनाने करण्यात येईल :—

(अ) ज्यांचे वय ३३ वर्षांपेक्षा जास्त नाही;

(ब) ज्यांनी उच्च माध्यमिक प्रमाणपत्र परीक्षा उत्तीर्ण केली आहे; आणि

(क) जे मान्यताप्राप्त संस्थेची फोटोग्राफी या विषयाची पदविका किंवा प्रमाणपत्र धारण करतात आणि ज्यांना वरील (ब) येथील अर्हता धारण केल्यानंतर शासन मान्य संस्थेमधील फोटोग्राफी, प्रिंटींग, एनलार्जिंग आणि त्याशी संबंधित शास्त्र किंवा तंत्रज्ञान इत्यादी आणि ऑडिओ व्हीज्यूअल मशिन चालविण्याचा प्रत्यक्ष कामाचा ३ वर्षांपेक्षा कमी नाही इतका अनुभव औद्योगिक प्रशिक्षण संस्था/शासनमान्य संस्थेतून प्राप्त केला आहे.

५. संचालनालयातील कलाकार तथा शिल्पकार, गट-क पदावरील नियुक्ती, पुढील अटी पूर्ण करणाऱ्या उमेदवारांमधून नामनिर्देशनाने करण्यात येईल :—

(अ) ज्यांचे वय ३३ वर्षांपेक्षा जास्त नाही;

(ब) ज्यांनी उच्च माध्यमिक शाळा प्रमाणपत्र परीक्षा उत्तीर्ण केली आहे; आणि

(क) जे कला किंवा शिल्पकला या विषयाची पदविका धारण करतात :

परंतु, माती, शाडू, धातू किंवा प्लॅस्टर ऑफ पॅरीसपासून पुतळे तयार करण्याचे प्रत्यक्ष ज्ञान असणाऱ्या उमेदवारांना अधिक पसंतीक्रम राहील.

६. पंपचालक, गट-क पदावरील नेमणूका पुढीलपैकी कोणत्याही मार्गाने करता येतील:—

(अ) आदिवासी विकास सेवेतील गट-ड मधील माळी, पाणीवाला हे पद धारण करणाऱ्या व त्या संवर्गात ३ वर्षांपेक्षा कमी नाही इतकी नियमित सेवा झालेल्या आणि नामनिर्देशनाने नियुक्ती करण्यासाठी या नियमाच्या खंड (ब) मधील उप-खंडे (२), (३) आणि (४) मध्ये विहित केलेली पात्रता व अनुभव धारण करणाऱ्या व्यक्तींमधून जेष्ठता अधिन पात्रता निकषावर पात्र ठरविलेल्या योग्य व्यक्तीच्या पदोन्नतीने.

(ब) पुढील अटी पूर्ण करणाऱ्या उमेदवारांमधून नामनिर्देशनाने,—

(१) ज्यांचे वय ३३ वर्षांपेक्षा जास्त नाही;

(२) ज्यांनी माध्यमिक शाळा प्रमाणपत्र परीक्षा उत्तीर्ण केली आहे;

(३) जे मान्यताप्राप्त संस्था/औद्योगिक प्रशिक्षण संस्थेचे तारतंत्री या विषयाचे व्यावसायीक प्रशिक्षण प्रमाणपत्र धारण करतात आणि ज्यांना विद्युत मोटार आणि स्टार्टरच्या दुरुस्तीचे पुरेसे ज्ञान अवगत आहे ;

(४) ज्यांनी वरील पोट-नियम (३) येथे नमूद केलेली अर्हता धारण केल्यानंतर दोन वर्षांपेक्षा कमी नाही इतक्या कालावधीचा पंपचालकाचा प्रत्यक्ष कामाचा अनुभव धारण केला आहे.

७. नियम ६ येथे नमूद केलेल्या पदावरील नेमणूका पदोन्नती व नामनिर्देशनाने ५०:५० या गुणोत्तर प्रमाणात करण्यात येतील :

परंतु, पदोन्नतीने नियुक्तीसाठी उमेदवार उपलब्ध न झाल्यास, या नियमात विहित केलेले भरतीचे प्रमाण शिथील करून नामनिर्देशनाद्वारे नियुक्ती करता येईल.

८. नियम ३, ४ आणि ५ येथे नमूद केलेल्या पदावर नामनिर्देशनाने आणि नियम ६ येथे नमूद केलेल्या पदावर पदोन्नतीने किंवा नामनिर्देशनाने नियुक्त केलेल्या व्यक्ती जर ती अगोदरच उत्तीर्ण झाली नसेल किंवा तिला उत्तीर्ण होण्यापासून सूट मिळाली नसेल तर, त्या पदासाठी विहीत केलेल्या विभागीय परीक्षा आणि हिंदी व मराठी भाषा परीक्षा त्या संबंधी केलेल्या नियमानुसार उत्तीर्ण करणे आवश्यक राहील.

९. आणखी असे की, नियम ३, ४, ५ आणि ६ येथे नामनिर्देशनाने नियुक्तीसाठी विहित केलेली उच्च वयोमर्यादा अगोदरच शासन सेवेत कार्यरत असलेल्या उमेदवारांच्या बाबतीत ५ वर्षांनी शिथीलक्षम राहील.

१०. नियम ३, ४, ५ व ६ येथे नमूद केलेल्या पदावर पदोन्नती अथवा नामनिर्देशनाने नियुक्त होणाऱ्या व्यक्तीला महाराष्ट्र शासनाच्या माहिती तंत्रज्ञान संचालनालयाने वेळोवेळी विहीत केलेले संगणक हाताळणी / वापराबाबतचे प्रमाणपत्र धारण करणे आवश्यक राहील.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

**कृ. मा. पवार,**
शासनाचे सह सचिव.

## TRIBAL DEVELOPMENT DEPARTMENT

Mantralaya Annexe, Mumbai 400 032, dated 10th January 2006

*NOTIFICATION*

CONSTITUTION OF INDIA.

No. TDR-1096/CR-27(B)/D-XV.— In exercise of the powers conferred by proviso to the Article 309 of the Constitution of India the Governor of Maharashtra is hereby pleased to make the following rules regulating recruitment to the post of Tracer, Cameraman-Cum-Projector Operator, Artist-Cum-Modeler, Pump Operator, Group-C in the Commissionerate / Directorate under the Tribal Development Department of the Government of Maharashtra, namely :—

1. These Rules may be called the Tracer, Cameraman-Cum-Projector Operator, Artist-Cum-Modeler, Pump Operator, Group-C in Tribal Development Services ( Recruitment) Rules, 2006.

2. In these Rules, unless the context requires otherwise :—

(*a*) " Commissionerate " means Commissionerate of Tribal Development ;

(*b*) " Degree " means a degree of a Statutory University;

(*c*) " Department " means the Tribal Development Department of the Government ;

(*d*) "Diploma" means a Diploma of Statutory University or Recognised Institute ;

(*e*) "Directorate" means the office of Director, Tribal Research and Training Institute, Pune;

(*f*) "Government" means the Government of Maharashtra;

(*g*) "H.S.C.Examination" means Higher Secondary School Certificate Examination conducted by a Divisional Board under the Maharashtra Secondary and Higher Secondary Education Board Act, 1965 (Mah.XLI of 1965) and includes only other examination declared by Government to be equivalent thereto;

(*h*) "I.T.I.Certificate" means a certificate issued by the institute recognised by the State Vocational Training Council

or the Higher and Technical Education Department of the Government of Maharashtra;

(*i*) "S.S.C. Examination" means Secondary School Certificate Examination conducted by a Divisional Board under the Maharashtra Secondary and Higher Secondary Education Board Act, 1965 (Mah.XLI of 1965) and includes any other examination declared by Government to be equivalent thereto.

3. Appointment to the post of Tracer, Group-C shall be made by nomination from amongst the candidates who :—

(*a*) are not more than 33 years of age;

(*b*) have passed S.S.C. examination;

(*c*) have passed Intermediate Grade Drawing Examination of the Government or recognised institution :

Provided that preference will be given to those candidates, who have working experience of not less than 2 years in Tracing gained after acquiring the qualification mentioned in sub-rules (*b*) and (*c*) above.

4. Appointment to the post of Cameraman-cum-Projector Operator, Group-C shall be made by nomination from amongst the candidates who :—

(*a*) are not more than 33 years of age ;

(*b*) have passed Higher Secondary Certificate examination;

(*c*) possess a Diploma or Certificate in Photography and working experience of not less than three years in Photography, Printing and enlarging or allied sciences or technologies and practical experience of operating Audio-Visual Machines from I.T.I. or Government Recognised Institution gained after acquiring the qualification mentioned in sub-rule (*b*).

5. Appointment to the post of Artist-cum-Modeler (Shilpakar), Group-C shall be made by nomination from amongst the candidates who :—

(*a*) are not more than 33 years of age ;

(*b*) have passed Higher Secondary Certificate examination;

(*c*) possess a Diploma in Art or Sculpture :

Provided that preference will be given to those candidates having practical knowledge of making statues of clay or plaster-of-paris or metals.

6. Appointment to the post of Pump Operator, Group-C shall be made either :—

(*a*) by promotion of a suitable person on the basis of seniority subject to fitness from amongst the persons holding the post of Gardener, Waterman in Group-D in the cadre

of Tribal Development services having not less than three years regular service in that post and possessing qualification and experience prescribed for appointment by nomination in sub-rules (*ii*) (*iii*) and (*iv*) of sub rules (*b*) of this Rule;

(*b*) by nomination from amongst the candidates who,—

(*i*) are not more than 33 years of age;

(*ii*) passed S.S.C. examination;

(*iii*) possess a professional course certificate in Wireman of recognised Institute or Industrial Training Institute and have adequate knowledge in repairing the Electric Motor and Starter, and;

(*iv*) possess practical experience of Pump Operating for a period of not less than two years, gained after acquiring qualification mentioned in sub-rules (*iii*).

7. Appointment to the post by promotion and nomination mentioned in Rule 6 shall be made in ratio of 50:50 :

Provided that if the candidates for appointment by promotion are not available the appointment shall be made by nomination in relaxation of the ratio prescribed in this rule.

8. A person appointed to any of the posts mentioned in rules 3, 4 and 5 by nomination and posts mentioned in rule 6 by promotion or nomination shall be required to pass the prescribed departmental examination and examination in Hindi and Marathi in accordance with the Rules made in that behalf unless he has already passed or has been exempted from passing those examinations.

9. The age limit prescribed for appointment by nomination mentioned in Rules 3, 4, 5 and 6 shall be relaxed by five years in case of the candidates already working in Government service.

10. A person appointed to the post mentioned in Rules 3, 4, 5 and 6 should possess a Certificate in Computer Operation prescribed by the Directorate of Information Technology, Government of Maharashtra from time to time.

By order and in the name of the Governor of Maharashtra,

**K. M. PAWAR,**
Joint Secretary to Government.

## आदिवासी विकास विभाग

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२, दिनांक १० जानेवारी २००६

## अधिसूचना

**भारताचे संविधान.**

क्रमांक टिडीआर. १०९६ / प्र.क्र.२७ (क) / का.१५.— भारतीय संविधानाच्या अनुच्छेद ३०९ खालील परंतुकान्वये प्रदान केलेल्या अधिकाराचा वापर करून महाराष्ट्राचे राज्यपाल, याद्वारे महाराष्ट्र शासनाच्या आदिवासी विकास विभागाच्या अखत्यारिखाली असलेल्या कार्यालयातील, प्रयोगशाळा सहायक, ग्रंथपाल आणि सहायक ग्रंथपाल, गट-क पदाच्या सेवाभरतीचे विनियमन करणारे पुढील नियम करीत आहे. जसे -

१. या नियमांना आदिवासी विकास सेवेतील प्रयोगशाळा सहायक, ग्रंथपाल आणि सहायक ग्रंथपाल, गट-क पदांचे (सेवाप्रवेश) नियम, २००६ असे संबोधण्यात यावे.

२. या नियमात संदर्भानुसार दुसरा अर्थ अभिप्रेत नसेल तर,—

(अ) "आयुक्तालय" म्हणजे आदिवासी विकास आयुक्तालय ;

(ब) "प्रमाणपत्र" म्हणजे शासन मान्यताप्राप्त महाविद्यालयाचे अथवा संस्थेचे ग्रंथालय प्रशिक्षण यामधील प्रमाणपत्र.

(क) "माध्यमिक शाळा प्रमाणपत्र" म्हणजे महाराष्ट्र माध्यमिक आणि उच्च माध्यमिक शिक्षण मंडळ अधिनियम, १९६५ (१९६५ चा अधिनियम क्र.४१) अन्वये आयोजित करण्यात आलेली माध्यमिक शाळा प्रमाणपत्र परीक्षा अथवा शासनाने समतुल्य म्हणून घोषित केलेली अन्य कोणतीही परीक्षा.

(ड) "विभाग" म्हणजे महाराष्ट्र शासनाचा आदिवासी विकास विभाग ;

(ई) "शासन" म्हणजे महाराष्ट्र शासन ;

(उ) "संचालनालय" म्हणजे संचालक, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे यांचे कार्यालय.

३. प्रयोगशाळा सहायक, गट-क पदावरील नियुक्ती पुढीलपैकी कोणत्याही मार्गाने करता येईल :—

(अ) प्रयोगशाळा परिचर हे पद धारण करणाऱ्या आणि त्या संवर्गात ३ वर्षांपेक्षा कमी नाही इतकी नियमित सेवा झालेल्या आणि या नियमाच्या खंड (ब) च्या उपखंड (२) मध्ये नामनिर्देशनाने नियुक्तीसाठी विहित केलेली शैक्षणिक अर्हता धारण करणाऱ्या व्यक्तींमधून ज्येष्ठता अधीन पात्रता या निकषावर पात्र ठरविलेल्या योग्य व्यक्तीच्या पदोन्नतीने, किंवा,

(ब) पुढील अटी पूर्ण करणाऱ्या उमेदवारामधून नामनिर्देशनाने,

(१) ज्यांचे वय ३३ वर्षांपेक्षा जास्त नाही;

(२) ज्यांनी माध्यमिक शालांत प्रमाणपत्र परीक्षा उत्तीर्ण केली आहे.

४. ग्रंथपाल, गट-क या पदावरील नियुक्ती पुढीलपैकी कोणत्याही मार्गाने करण्यात

येईल :—

(अ) सहायक ग्रंथपाल हे पद धारण करणाऱ्या आणि त्या संवर्गात ३ वर्षांपेक्षा कमी नाही इतकी नियमित सेवा झालेल्या व्यक्तीमधून ज्येष्ठता अधीन पात्रता या निकषावर पात्र ठरविलेल्या व्यक्तीच्या पदोन्नतीने, किंवा,

(ब) पुढील अटी पूर्ण करणाऱ्या उमेदवारामधून नामनिर्देशनाने,—

(१) ज्यांचे वय ३३ वर्षांपेक्षा जास्त नाही ;

(२) ज्यांनी माध्यमिक शालांत प्रमाणपत्र परीक्षा उत्तीर्ण केली आहे,

(३) ज्यांनी ग्रंथालय प्रशिक्षण यामधील शासन मान्यताप्राप्त महाविद्यालयाचे अथवा संस्थेचे प्रमाणपत्र धारण केले आहे :

परंतु, ग्रंथालय शास्त्र या मधील पदविका धारण करणाऱ्या आणि किमान २ वर्षांपेक्षा कमी नाही इतका ग्रंथालय कामाचा अनुभव असलेल्या उमेदवारांना पसंतीक्रम राहील.

५. सहायक ग्रंथपाल, गट-क या पदावरील नियुक्ती, पुढील अटी पूर्ण करणाऱ्या उमेदवारामधून नामनिर्देशनाने करण्यात येईल :—

(अ) ज्यांचे वय ३३ वर्षांपेक्षा जास्त नाही.

(ब) ज्यांनी माध्यमिक शाळा प्रमाणपत्र परीक्षा उत्तीर्ण केली आहे, आणि

(क) ज्यांनी मान्यताप्राप्त संस्था किंवा महाविद्यालयाचे ग्रंथालय प्रशिक्षण प्रमाणपत्र धारण केले आहे.

६. नियम ३ व ४ येथे नमूद केलेल्या पदावरील नेमणुका पदोन्नती व नामनिर्देशनाने अनुक्रमे ५०:५० व २०:८० या गुणोत्तर प्रमाणात करण्यात येतील.

७. नियम ३ व ४ येथे नमूद केलेल्या पदावर पदोन्नती व नामनिर्देशनाने व नियम ५ येथे नमूद केलेल्या पदावर नामनिर्देशनाने नियुक्ती केलेल्या व्यक्ती जर ती अगोदरच उत्तीर्ण झाली नसेल किंवा उत्तीर्ण होण्यापासून सूट मिळाली नसेल तर त्या पदासाठी विहित केलेली विभागीय परीक्षा आणि हिंदी व मराठी भाषा परीक्षा त्या संबंधी केलेल्या नियमानुसार उत्तीर्ण करणे आवश्यक राहील.

८. नियम ३,४ व ५ येथे नमूद केलेल्या पदावर पदोन्नती अथवा नामनिर्देशनाने नियुक्त होणाऱ्या व्यक्तीला महाराष्ट्र शासनाच्या माहिती तंत्रज्ञान संचालनालयाने वेळोवेळी विहित केलेले संगणक हाताळणी / वापराबाबतचे प्रमाणपत्र धारण करणे आवश्यक राहील.

९. नियम ३,४ आणि ५ येथे नमूद केलेल्या पदावर नियुक्ती केलेली व्यक्ती राज्यात कोणत्याही ठिकाणी बदली करण्यास पात्र राहील.

महाराष्ट्राचे राज्यापाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

**कृ. मा. पवार,**

शासनाचे सहसचिव.

## TRIBAL DEVELOPMENT DEPARTMENT

Mantralaya Annexe, Mumbai 400 032, dated 10th January 2006

*NOTIFICATION*

CONSTITUTION OF INDIA.

No. TDR-1096/CR-27(C)/D-XV.— In exercise of the powers conferred by proviso to the Article 309 of the Constitution of India, the Governor of Maharashtra is hereby pleased to make the following Rules regulating recruitment to the post of Laboratory Assistant, Librarian and Assistant Librarian, Group-C posts in the various offices of the Tribal Development Services under the Tribal Development Department of the Government of Maharashtra namely:—

1. These rules may be called the Laboratory Assistant, Librarian and Assistant Librarian; Group-C in the Tribal Development Services (Recruitment) Rules, 2006.

2. In these Rules, unless the context requires otherwise :—

(*a*) "Certificate" means a certificate in Library Training of Government recognised college or institute ;

(*b*) "Commissionerate" means Commissionerate of Tribal Development;

(*c*) "Department" means the Tribal Development Department of the Government ;

(*d*) "Directorate" means the office of Director, Tribal Research and Training Institute, Pune;

(*e*) "Government" means the Government of Maharashtra;

(*f*) "S.S.C. Examination" means the Secondary School Certificate Examination conducted by a Divisional Board under the Maharashtra Secondary and Higher Secondary Education Boards Act, 1965 (Mah. XLI of 1965) and includes any other examination declared by Government to be equivalent thereto.

3. Appointment to the post of Laboratory Assistant, Group-C shall be made either :—

(*a*) by promotion of a suitable person on the basis of seniority subject to fitness from amongst the persons holding

the post of Laboratory Attendant having not less than 3 years regular service in that post and possess educational qualification mentioned in sub-clause (*ii*) of Clause (*b*) for appointment by nomination.

*OR*

(*b*) by nomination from amongst the candidates who,—

(*i*) are not more than 33 years of age,

(*ii*) have passed S.S.C. examination.

4. Appointment to the post of Librarian, Group-C shall be made either:—

(*a*) by promotion of a suitable person on the basis of seniority subject to fitness from amongst the persons holding the post of Assistant Librarian having not less than three years regular service in that post;

*OR*

(*b*) by nomination from amongst the candidates who,—

(*i*) are not more than 33 years of age.

(*ii*) have passed S.S.C. examination; and

(*iii*) possess a certificate in Library Training from Government recognised College or Institute :

Provided that preference may be given to those candidates who possess diploma in Library Science and having experience of Library work for not less than two years.

5. Appointment to the post of Assistant Librarian,Group-C shall be made by nomination from amongst the candidates who:—

(*a*) are not more than 33 years of age;

(*b*) have passed S.S.C. Examination;

(*c*) possess a certificate in Library Training of recognised College or Institute.

6. Appointment to the post mentioned in Rule 3 and 4 by promotion and nomination shall be made in the ratio of 50:50, and 20:80 respectively.

7. A person appointed to any of the posts mentioned in rules 3 and 4 either by promotion or by nomination and post

mentioned in Rule 5 by nomination shall be required to pass the prescribed departmental examination and examination in Hindi and Marathi according to the Rules made in that behalf unless he has already passed or has been exempted from passing those examinations.

8. A person appointed to the post mentioned in Rules 3,4 and 5 should possess a Certificate in Computer Operation prescribed by the Directorate of Information Technology, Government of Maharashtra from time to time.

9. A person appointed to any of the post mentioned in Rules 3, 4 and 5 shall be liable for transfer anywhere in the State.

By order and in the name of the Governor of Maharashtra,

K. M. PAWAR,

Joint Secretary to Government.

## आदिवासी विकास विभाग,

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२, दिनांक १० जानेवारी २००६

### अधिसूचना

**भारताचे संविधान.**

क्रमांक टिडीआर १०९६ / प्र.क्र.२७ ( ड ) / का.१५.– भारतीय संविधानाच्या अनुच्छेद ३०९ खालील परंतुकान्वये प्रदान केलेल्या अधिकाराचा वापर करून आणि अस्तित्वात असलेले संबंधित सर्व विद्यमान नियम, आदेश किंवा अनुदेश अधिक्रमित करून महाराष्ट्राचे राज्यपाल, याद्वारे महाराष्ट्र शासनाच्या आदिवासी विकास विभागाच्या अखत्यारिखाली असलेल्या कार्यालयातील नाईक, यंत्रचालक, प्रयोगशाळा परिचर, परिचर, स्वयंपाकी, माळी, कामाठी, सज्जा परिचर, पाणीवाला, गट-ड मधील पदांचे सेवाभरतीचे विनियमन करणारे पुढील नियम करीत आहे. जसे :-

१. या नियमांना आदिवासी विकास विभागाच्या अखत्यारितील कार्यालये/ आश्रमशाळा/ वसतिगृहे आणि संस्थेतील ; नाईक, यंत्रचालक, प्रयोगशाळा परिचर, परिचर, स्वयंपाकी, माळी, कामाठी, सज्जा परिचर, पाणीवाला, गट-ड पदांचे (सेवाप्रवेश) नियम, २००६ असे संबोधण्यात यावे.

२. या नियमात संदर्भानुसार दुसरा अर्थ अभिप्रेत नसेल तर,—

(अ) "आयुक्तालय" म्हणजे आदिवासी विकास आयुक्तालय ;

(ब) "कार्यालय/संस्था" म्हणजे आदिवासी विकास विभागाच्या अधिपत्याखालील कार्यालये, प्रशिक्षण संस्था, आश्रमशाळा, वसतिगृहे ;

(क) "मान्यताप्राप्त संस्था" म्हणजे शासनाकडून मान्यता देण्यात आलेली संस्था ;

(ड) "विभाग" म्हणजे महाराष्ट्र शासनाचा आदिवासी विकास विभाग ;

(इ) "शासन" म्हणजे महाराष्ट्र शासन.

३. नाईक आणि यंत्रचालक, गट-ड या पदावरील नियुक्ती प्रयोगशाळा परिचर, सज्जा परिचर, परिचर, माळी, किंवा पाणीवाला हे पद धारण करणाऱ्या आणि त्या संवर्गात ३ वर्षांपेक्षा कमी नाही इतकी नियमित सेवा झालेल्या व्यक्तींमधून ज्येष्ठता अधीन पात्रता या निकषावर पात्र ठरविलेल्या योग्य व्यक्तींच्या पदोन्नतीने करण्यात येईल.

४. स्वयंपाकी या पदावरील नियुक्ती पुढीलपैकी कोणत्याही मार्गाने करता येईल :-

(अ) कामाठी हे पद धारण करणाऱ्या आणि त्या संवर्गात ३ वर्षांपेक्षा कमी नाही इतकी नियमित सेवा झालेल्या व्यक्तींमधून ज्येष्ठता अधीन पात्रता या निकषावर पात्र ठरविलेल्या योग्य व्यक्तीच्या पदोन्नतीने, किंवा

(ब) पुढील अटी पूर्ण करणाऱ्या उमेदवारांमधून नामनिर्देशनाने,—

(१) ज्यांचे वय ३३ वर्षांपेक्षा जास्त नाही ;

(२) ज्यांनी शासन मान्यताप्राप्त प्राथमिक शाळेतून इयत्ता ४ थी ची परीक्षा उत्तीर्ण केली आहे.

परंतू स्वयंपाक करण्याच्या कामाचा अनुभव असलेल्या उमेदवारांना पसंतीक्रम राहील.

५. प्रयोगशाळा परिचर या पदावरील नियुक्ती पुढील अटी पूर्ण करणाऱ्या उमेदवारांमधून नामनिर्देशनाने करण्यात येईल :–

(१) ज्यांचे वय ३३ वर्षांपेक्षा जास्त नाही ;

(२) ज्यांनी शासन मान्यताप्राप्त माध्यमिक शाळेतून इयत्ता ९ वी ची परिक्षा उत्तीर्ण केली आहे :

परंतू माध्यमिक शालांत प्रमाणपत्र परिक्षा उत्तीर्ण करणाऱ्या उमेदवारांना पसंतीक्रम राहील.

६. माळी या पदावरील नियुक्ती पुढील अटी पूर्ण करणाऱ्या उमेदवारांमधून नामनिर्देशनाने करण्यात येईल :–

(१) ज्यांचे वय ३३ वर्षांपेक्षा जास्त नाही ;

(२) ज्यांनी शासन मान्यताप्राप्त प्राथमिक शाळेची इ. ४ थी ची परिक्षा उत्तीर्ण केली आहे, आणि

(३) ज्यांनी शासन मान्य संस्थेचे माळी या पदासाठी विहित केलेले प्रमाणपत्र धारण केले आहे.

७. कामाठी, सज्जा परिचर, परिचर आणि पाणीवाला या पदावरील नियुक्ती पुढीलपैकी कोणत्याही मार्गाने करता येईल :-

(अ) पुढील अटी पूर्ण करणाऱ्या उमेदवारांमधून नामनिर्देशनाने,

(१) ज्यांचे वय ३३ वर्षांपेक्षा जास्त नाही ;

(२) ज्यांनी शासन मान्यताप्राप्त प्राथमिक शाळेची इयत्ता ४ थी ची परीक्षा उत्तीर्ण केली आहे.

(ब) आदिवासी विकास सेवेतील समतुल्य वेतनश्रेणीतील पद धारण करणाऱ्या आणि या नियमाच्या खंड (अ) च्या उपखंड (२) येथे नमूद केलेली शैक्षणिक अर्हता धारण करीत असलेल्या योग्य व्यक्तीच्या बदलीने.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

**कृ. मा. पवार**

शासनाचे सह सचिव.

## TRIBAL DEVELOPMENT DEPARTMENT

Mantralaya Annexe, Mumbai 400 032, dated 10 January 2006

*NOTIFICATION*

CONSTITUTION OF INDIA.

No. TDR-1096/CR-27(D)/D-XV.—In exercise of the powers conferred by proviso to the article 309 of the Constitution of India and in supersession of all existing rules, orders or instruments issued in this behalf the Governor of Masharashtra is hereby pleased to make the following rules regulating recruitment to the post of Naik, Machine Operater, Laboratory Attendant, Attendant, Cook, Gardener, Kamathi, Galary Attendant, Waterman in Group-D in the various offices of the Tribal Development under the Tribal Development Department of the Government of Maharashtra; namely:-

1. These rules may be called the Naik, Machine Operater, Laboratory Attendant, Attendant, Cook, Gardener, Kamathi, Galary Attendant , Waterman in Group-D, in the offices/Ashram Schools/Hostels and Institutes under the Tribal Development Services (Recruitment) Rules,2006.

2. In these rules, unless the context requires otherwise:—

(*a*) "Commissionerate" means Commissionerate of Tribal Development;

(*b*) "Department" means the Tribal Development Department of Government of Maharashtra;

(*c*) "Government" means the Government of Maharashtra;

(*d*) "Office/Institute" means an Offices/Institutes/Ashram Schools/Hostels under the Tribal Development Department ;

(*e*) "Recognised Institute" means an institution recognised by the Government;

3. Appointment to the post of Naik and Machine Operator; Group-D, shall be made by promotion of a suitable person on the basis of seniority subject to fitness, from amongst the persons holding the post of Laboratory Attendant, Galary Attendant, Attendant, Gardener or Waterman having not less than three years regular service in that post.

4. Appointment to the post of Cook shall be made either :—

(*a*) by promotion of a suitable person on the basis of seniority subject to fitness from amongst the persons holding the post of Kamathi having not less than three years regular service in that post,

*OR*

(*b*) by nomination from amongst the candidates who,—

(*i*) are not more than 33 years of age;

(*ii*) have passed the IV standard Primary School Examination of a school recognised by Government :

Provided that preference may be given to those candidates who have experience of cooking.

5. Appointment to the post of Laboratory Attendant shall be made by nomination from amongst candidates, who :—

(*i*) are not more than 33 years of age; and

(*ii*) have passed IX standard from the Secondary School recognised by Government :—

Provided that preference may be given to those candidates who have passed Secondary School Certificate Examination.

6. Appointment to the post of Gardener shall be made by nomination from amongst the candidates who :—

(*i*) are not more than 33 years of age;

(*ii*) have passed IV standard Primary School Examination of a school recognised by Government; and

(*iii*) possess a course certificate prescribed for the post of Gardener of any institute recognised by Government.

7. Appointment to the post of Kamathi, , Galary Attendant, Attendant and Waterman shall be made either :—

(*a*) by nomination from amongst the candidates who, —

(*i*) are not more than 33 years of age; and

(*ii*) have passed the IV standard Primary School examination of a school recognised by Government;

*OR*

(*b*) by transfer of a suitable person holding the post in equivalent pay scale of Tribal Development service and who possess qualification mentioned in sub-clause (a) (ii) of this rule.

By order and in the name of the Governor of Maharashtra,

K. M. PAWAR,
Joint Secretary to Government.

शासकीय मध्यवर्ती मुद्रणालय, मुंबई